**गौण खनिजाच्या अवैध उत्खनन व वाहतूकीस आळा घालण्याकरिता करावयाच्या उपाययोजना.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः गौखनि १०/०३१६/प्र.क्र.२०४/ख**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: १४/०६/२०१७

वाचा : (१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्रमांक : गौखनि १०/२००५/प्र.क्र. २३३/ख, दिनांक १७/१०/२००५.

(२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्रमांक : गौखनि १०/०७०७/प्र.क्र. २४९/ख, दिनांक २४/०८/२००७.

(३) शासनपत्र महसूल व वन विभाग क्रमांक गौखनि ३९/०११२/प्र.क्र. २ (भाग-१)/ख, दिनांक १२/०१/२०१२.

(४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक : गौखनि १०/०५१२/प्र.क्र. ३००/ख दिनांक १२ मार्च, २०१३

(५) दिनांक १७/०८/२०१५ रोजी राजपत्रात अधिसूचीत महाराष्ट्र अधिनियम क्र. २७/२०१५.

(६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक : गौखनि १०/०६१५/प्र.क्र. २८७/ख दिनांक ५ डिसेंबर, २०१५

(७) केंद्र शासन, पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालय अधिसूचना क्र.:एस.ओ.१४१(E) दिनांक १५.०१.२०१६

(८) दिनांक २९/०१/२०१६ रोजी राजपत्रात अधिसूचीत महाराष्ट्र अधिनियम क्र.०५/२०१६.

(९) शासन पत्र महसूल व वन विभाग क्रमांक : गौखनि १०/०२१६/प्र.क्र. १५८/ख, दिनांक २४ फेब्रुवारी, २०१६ व दिनांक २२ मार्च, २०१६

(१०) दिनांक १५/०४/२०१७ रोजी राजपत्रात अधिसूचीत महाराष्ट्र अधिनियम क्र. ३०/२०१७.

## -: शासन परिपत्रक :-

गौण खनिजाच्या अवैध उत्खनन व वाहतूकीस प्रतिबंध करण्याकरिता करावयाच्या उपाययोजनांसंबंधी वेळोवेळी शासनाकडून सूचना देण्यात आल्या आहेत. तसेच संबंधित अधिनियमांमध्ये आवश्यक त्या सुधारणाही करण्यात आलेल्या आहेत. तथापि, गौण खनिजाच्या अवैधरित्या होत असलेल्या उत्खनन व वाहतूकीबाबत तसेच संबंधित कायद्यातील तरतूदींची प्रभावी अंमलबजावणी होत नसल्याबाबत लोकप्रतिनिधी, जनता व प्रसारमाध्यमांतून मोठया प्रमाणावर राज्य शासनाकडे तक्रारी प्राप्त होत आहेत. त्याअनुषंगाने गौण खनिजाच्या अवैध उत्खनन व वाहतूकीस

प्रभावीपणे प्रतिबंध करण्याकरिता याविषयी साकल्याने विचार केल्यानंतर पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे निर्देश या शासन परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत :-

(i) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ४८(७) मध्ये, अवैध उत्खनन / वाहतूक केलेल्या गौण खनिजाच्या बाजारमुल्याच्या ५ पटीपर्यंत दंड आकारण्याची तरतूद करण्यात आली आहे. तसेच कलम ४८(८) मध्ये, गौण खनिजाच्या अवैध उत्खननाकरीता वापरण्यात आलेली यंत्रसामग्री व वाहतुकीकरीता वापरण्यात आलेली वाहने जप्त करण्याची तरतूद करण्यात आली आहे.

सदर तरतुदीनूसार गौण खनिजाच्या अवैध उत्खनन / वाहतूकीच्या प्रकरणात अवैध उत्खनन किंवा वाहतूक करण्यात आलेल्या गौण खनिजाच्या बाजारभावाच्या आधारे दंडात्मक आकारणी करण्यासाठी, जिल्हाधिकारी यांनी जिल्हयातील प्रत्येक गौण खनिजाच्या बाजारभावाची सरासरी काढून, दरवर्षी १ जानेवारी रोजी प्रत्येक गौण खनिजाचे बाजारभाव निश्चित करावे व त्यानुसार संबंधीत गौण खनिजाच्या दंडाच्या रकमेची परिगणना करण्यात यावी आणि प्रकरणपरत्वे दंडात्मक कारवाई करण्यापूर्वी संबंधितांना नोटीस देवून त्यांची बाजू ऐकून घेऊन कायद्यातील तरतुदींनुसार स्वयंस्पष्ट आदेश पारीत करण्यात यावेत.

(ii) वाळूच्या अवैध उत्खनन व वाहतूकीस आळा घालण्यासाठी " महाराष्ट्र झोपडपट्टी गुंड, हातभट्टीवाले, औषधिद्रव्यविषयक गुन्हेगार, धोकादायक व्यक्ती व दृकश्राव्य कलाकृतीचे विनापरवाना प्रदर्शन करणाऱ्या व्यक्ती (व्हिडीओ पायरेटस) यांच्या विघातक कृत्यांना आळा घालण्याबाबत अधिनियम, १९८१" मध्ये महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ५/२०१६ अन्वये सुधारणा करण्यात आली असून, आता सदर अधिनियमात "वाळू तस्कर" या संज्ञेचा समावेश करण्यात आला आहे. याबाबतची सुधारणा करण्याकामी प्रथम सन २०१५ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक २३, दि. ०१/१२/२०१५ रोजी व नंतर सन २०१६ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ५, दि. २९.१.२०१६ रोजी राजपत्रात प्रसिध्द करण्यात आला आहे. यापूर्वी वाळूचे अवैध उत्खनन वा वाहतूक केल्याबद्दल गुन्हा नोंदविलेल्या इसमाकडून पुन्हा तोच गुन्हा घडल्यास अशा इसमाविरुध्द सदर अधिनियमातील तरतूदीनुसार पोलीसांच्या मदतीने प्रतिबंधात्मक स्थानबध्दतेची कारवाई करण्याबाबत विचार करण्यात यावा.

(iii) गौण खनिजाच्या अवैध उत्खनन व वाहतूकीविरूध्द प्रभावी कारवाई करण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा पोलीस अधीक्षक/पोलीस आयुक्त, प्रादेशिक परिवहन अधिकारी व जिल्हा खनिकर्म अधिकारी यांची समिती गठित करण्यात आली आहे. सदर समितीची बैठक दरमहा आयोजित करण्यात यावी व गौण खनिजाचे अवैध उत्खनन व वाहतूक होणार नाही याबाबत महसूल, पोलीस व परिवहन अधिकारी सतत दक्ष राहतील अशी वातावरण निर्मिती करण्यात यावी.

(iv) गौण खनिजाच्या अवैध वाहतूकीच्या प्रकरणात जप्त करण्यात आलेल्या वाहनांचा परवाना नियमानुसार निलंबित करण्याबाबत प्रादेशिक परिवहन अधिकाऱ्याकडे प्रस्ताव

पाठविण्यात यावा. मात्र, तसे करण्यापूर्वी संबंधित वाहनमालकाची बाजू ऐकून घेऊन वाहन अवैध वाहतूकीसाठी प्रत्यक्षात वापरल्याची खातरजमा करुन घ्यावी.

(v) गौण खनिजाचे अवैध उत्खनन/वाहतूक निदर्शनास आल्यास, संबंधित तलाठी / मंडळ अधिकाऱ्यांनी त्यांच्यास्तरावर प्रतिबंधात्मक कारवाई करावी आणि काही कारणास्तव ते शक्य होत नसल्यास, त्यांनी अशा बाबींची माहिती तात्काळ संबंधित तहसिलदार, उप विभागीय अधिकारी, जिल्हा खनिकर्म अधिकारी, अपर जिल्हाधिकारी किंवा जिल्हाधिकारी यांना विविध उपलब्ध संपर्क माध्यमाद्वारे (उदा. दूरध्वनी, एस.एम.एस, व्हॉटसॲप इ. द्वारे) न चुकता द्यावी. अशा अवैध उत्खननाबाबत माहिती मिळताच त्याविषयी संबंधित अधिकाऱ्यांनी पोलीसांच्या मदतीने नियमानुसार अविलंब कारवाई करण्याची दक्षता घ्यावी.

(vi) गौण खनिजाच्या उत्खननाचा / साठ्याचा पंचनामा करताना लिलावधारक किंवा परवानाधारक किंवा खाणपट्टाधारक किंवा साठाधारक किंवा संबंधित व्यक्ती यांच्या व पंचाच्या उपस्थितीत पंचनामा करुन, त्या संदर्भातील पंचनाम्याच्या प्रती संबधितांना देऊन त्या अनुषंगाने त्यांची बाजू मांडण्याची योग्य ती संधी देण्यात यावी. त्यानंतर प्रचलित नियमातील तरतूदी विचारात घेऊन पुढील कार्यवाही करण्यात यावी.

(vii) गौण खनिजाच्या अवैध वाहतुकीबाबत कारवाई करताना सदर गौण खनिज कुठून आणले आहे याचा आवर्जून शोध घेण्यात यावा व शोधाअंती असे गौण खनिज अवैध असल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित लिलावधारक/ खाणपट्टाधारक / परवानाधारक यांच्याविरुध्दही कारवाई करण्यात यावी.

(viii) स्थानिक पातळीवर वाळू अथवा इतर गौण खनिजांची चोरी रोखण्यासाठी भरारी पथके नेमावीत. या भरारी पथकांमध्ये महसूल, पोलीस व परिवहन या तिन्ही खात्यातील कर्मचाऱ्यांचा समावेश असेल. तसेच जिल्हाधिकारी/संबंधीत तहसिलदार हे भरारी पथकाच्या समन्वयाचे काम करतील. या भरारी पथकांनी वाळू/इतर गौण खनिजांच्या चोरीची संभाव्य ठिकाणे निश्चित करुन त्या ठिकाणी अचानक धाडी टाकाव्यात व वाळू/इतर गौण खनिजांचे ज्या ठिकाणी अवैध अथवा अनधिकृतरित्या उत्खनन अथवा वाहतूक होत असल्याचे आढळेल, तेथे संबंधितांविरुध्द दंडनिय तसेच मुद्देमाल जप्तीची कारवाई करावी व त्यांच्याकडून नियमानुसार स्वामित्वधन अधिक दंडाची रक्कम वसूल करावी.

(ix) गौण खनिजाचे अवैध उत्खनन व वाहतुकीस आळा घालण्याकरीता जिल्हा व तालुका स्तरावर स्थापन करण्यात आलेल्या दक्षता पथकांनी खाणपट्टे व वाळूगटांना भेट देवून तपासणी करण्यासाठी कालबध्द कार्यक्रम तयार करण्यात यावा. जिल्हाधिकारी/अपर जिल्हाधिकारी, उपविभागीय अधिकारी व तहसिलदार यांनी सदर कार्यक्रमाचे व्यक्तिशः काटेकोरपणे सनियंत्रण करावे.

(x) जिल्हास्तरावरील दक्षता पथकांनी केलेल्या तपासणीचा जिल्हाधिकाऱ्यांनी दरमहा आढावा घ्यावा. तालुका स्तरावरील दक्षता पथकांनी केलेल्या तपासणीची नोंदवही तहसिल स्तरावर ठेवण्यात यावी व उप विभागीय अधिकाऱ्यांनी सदर दक्षता पथकांनी केलेल्या

तपासणीचा दरमहा आढावा घेऊन संनियंत्रण अधिक परिमाणकारक होण्याच्या दृष्टीकोनातून आवश्यक ती कार्यवाही करावी.

(xi) गौण खनिजांच्या अवैध उत्खनन/वाहतूकीबाबतची जी प्रकरणे उघडकीस येतील. त्या प्रकरणात संबंधित ठेकेदार / लिलावधारक / खाणपट्टाधारक / परवानाधारक / वाहनचालक दोषी आढळल्यास त्यांच्याविरुध्द प्रचलित नियमानुसार योग्य ती कारवाई करण्यात यावीच, परंतु त्याचबरोबर सदर घटना अथवा प्रकरण ज्या महसूल अधिकारी/कर्मचारी यांच्या कार्यक्षेत्रात उघडकीस आले आहे ते अधिकारी/कर्मचारी सदर प्रकरणास जबाबदार आहेत किंवा कसे याचीही कसून तपासणी करण्यात यावी. जर तपासणीअंती संबंधित अवैध उत्खननास/वाहतूकीस स्थानिक अधिकारी/कर्मचारीसुध्दा जबाबदार आहेत असे आढळल्यास त्या अधिकारी/कर्मचारी यांच्यावरही त्याप्रमाणे जबाबदारी निश्चित करुन त्यांच्याविरुध्दही प्रचलित नियमानुसार त्वरित शिस्तभंगविषयक कारवाई सुरु करावी.

(xii) त्याचप्रमाणे गौण खनिजांच्या अवैध उत्खनन व वाहतूक करणाऱ्यांसोबत महसूल, पोलीस व परिवहन विभागातील अधिकारी व कर्मचारी यांचे संगनमत आढळून आल्यास अशा संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्यावर वैयक्तिक जबाबदारी निश्चित करून त्यांच्याविरूध्द कठोरतम कारवाई करण्यात यावी.

(xiii) ज्या भागात अवैध उत्खननाच्या घटना जास्त प्रमाणात आढळून येत असतील व अशा भागातील महसूल विभागातील अधिकारी/कर्मचारी यांचे प्रतिबंधात्मक प्रयत्न अपूरे आढळत असतील अशा कर्मचाऱ्याविरुध्द वैयक्तिक जबाबदारी निश्चित करून शिस्तभंगाची कठोर कारवाई हाती घेऊन, अशी कारवाई जास्तीत जास्त ३ महिन्यांत पूर्ण करण्यात यावी.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०६१३१७५३१६६५१९ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2017.06.14 13:51:28 +05'30'

( राजेंद क्षीरसागर )
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई. (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) सर्व मा.मंत्री व सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई.
७) सर्व मंत्रालयीन विभाग.
८) प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर
९) सर्व विभागीय आयुक्त.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, बेलार्ड इस्टेट, मुंबई-४०० ००१
११) सर्व जिल्हाधिकारी.
१२) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
१३) सर्व उपविभागीय अधिकारी.
१४) सर्व तहसिलदार.
१५) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई.
१६) महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), नागपूर.
१७) सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुबई ४०० ०३२.